**कनिष्ठ महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची उपस्थिती बायोमेट्रीक पध्दतीने सुरु करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१८/प्र.क्र.१३०/१८/एस.एम.-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:-१५ जून, २०१८

**प्रस्तावना :**

राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयातील (विज्ञान शाखा) विद्यार्थी नियमित वर्गांना उपस्थित न रहाता फक्त प्रात्यक्षिक वर्गाला उपस्थित राहतात व नियमित वर्गाऐवजी कोचिंग क्लासमध्ये उपस्थित राहतात. तसेच, अनेक कनिष्ठ महाविद्यालयांनी याकरीता खाजगी शिकवणी वर्गांसोबत सामंजस्य करार केला आहे. सदर महाविद्यालयातील विद्यार्थी शिकवणी वर्गात उपस्थित राहतात व नियमित वर्गांना अनुपस्थित राहातात अशा स्वरुपाच्या तक्रारी सुध्दा प्राप्त झाल्या आहेत. तसेच, यासंदर्भात विधीमंडळ सदस्यांनी वेळोवेळी सभागृहात प्रश्न उपस्थित केले आहेत. या सर्व प्रकारांना प्रतिबंध करण्यासाठी कनिष्ठ महाविद्यालयातील (विज्ञान शाखा) विद्यार्थ्यांची उपस्थिती बायोमेट्रीक पध्द्तीने सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील सर्व खाजगी अनुदानित/ विनाअनुदानित/ अंशत: अनुदानित/ स्वयंअर्थसहाय्यित कनिष्ठ महाविद्यालयातील (विज्ञान शाखा) विद्यार्थ्यांची उपस्थिती यापुढे बायोमेट्रीक पध्द्तीने सुरु करण्याचा निर्णय याव्दारे घेण्यात येत आहे.

२. सदर योजना ही टप्प्या टप्प्याने कार्यान्वित करण्यात येत असून २०१८-१९ या शैक्षणिक वर्षाकरीता मुंबई, पुणे, नागपूर, नाशिक व औरंगाबाद या पाच विभागातील सर्व कनिष्ठ महाविद्यालयातील (विज्ञान शाखा) विद्यार्थ्यांची उपस्थिती बायोमेट्रीक पध्द्तीने घेण्यात यावी.

३. बायोमेट्रीक उपस्थिती सुरु करण्याकरीता आवश्यक यंत्रसामुग्री कनिष्ठ महाविद्यालयांनी हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत स्वत: उपलब्ध करुन घ्यावी.

४. संबंधित शिक्षणाधिकारी (माध्य.)/ शिक्षण निरीक्षक यांनी सदर कनिष्ठ महाविद्यालयांत बायोमेट्रीक पध्दत सुरु करण्यात आली आहे किंवा कसे याबाबतची तपासणी करुन त्यासंदर्भातील अहवाल शासनास सादर करावा. तसेच सदर कनिष्ठ महाविद्यालयांना आकस्मिक भेट देऊन बायोमेट्रीक उपस्थितीचा वेळोवेळी आढावा घ्यावा.

५. जी कनिष्ठ महाविद्यालये बायोमेट्रीक उपस्थितीबाबत आवश्यक कार्यवाही करणार नाहीत, त्यांच्याविरुध्द् मान्यता काढून घेण्यासंदर्भातील उचित कारवाई करण्यात येईल.

६. संलग्नीत मंडळाचे महाविद्यालयातील उपस्थितीचे निकष पूर्ण करण्याची जबाबदारी संबंधित विद्यार्थ्यांची राहील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१८०६१५१४१७०१४६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati
Madhukar
Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2018.06.15 14:19:32 +05'30'

**( स्वा.म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक, माध्य. व उच्च माध्य. शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ, पुणे.
४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
५. सर्व शिक्षणाधिकारी (माध्य.)/ शिक्षण निरीक्षक.

**प्रत माहितीस्तव :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती (एम.एम.-३).